# हिरोशिमातील अग्निकांड



तोशी मारूकी
मराठी: नीलम्बरी जोशी

हिरोशिमा शहरातील ती एक प्रसन्न सकाळ होती. आकाश निरभ्र होते. आकाशात सूर्य तळपत होता. शहरातील बसेस ऑफिसला जाणाऱ्या लोकांची ने आण करण्यात मग्न होत्या. शहरातील सातही नदया संथपणे वाहात होत्या. पाण्यावर सूर्यकिरणे पडून ते चमचमत होते.



जापानमधील टोकियो, ओसाका, नागोया या आणि शहरांवर हवाई हल्ले चालू होते. या हल्ल्यांमधून आपले शहर वगळले गेल्याबद्दल हिरोशिमावासी आश्चर्य व्यक्त करीत होते. त्यांनी हवाई हल्ल्यांना तोंड देण्यासाठी शक्य तितकी सर्व खबरदारी घेतली होती. आग पसरांच्या धोका कमी करण्यासाठी जुन्या इमारती पाडून रस्ते रूंद केले होते. बॉम्बहल्ल्यापासून बचावासाठी सुरक्षित जागा निश्चित केल्या होत्या. अन्न, पाणी, औषधे अशा दैनंदिन वस्तूंचा साठा करून ठेवला होता. घराबाहेर पडताना सर्वजण शिरस्राण घालून पडत असत.



'मि' ही एक सात वर्षाची मुलगी याच शहरात आपल्या आईवडिलांसोबत राहात होती. 'मि'चे कुटुंब सकाळचा नेहमीचाच रताळ्यांचा नाश्ता करत होते. ती रताळी 'मि'च्या वडिलांना नाश्त्यासाठी खरेतर भात मिळाल्यास हवा होता पण आत्ता मिळत असलेल्या नाश्ताही चांगला आहे हे त्यांना कळत होते.



आणि तेवढ्यात अचानक प्रकाशात एक लोळ चमकला. प्रखर केशरी, मग हजारो विजा चमकल्यासारखा पांढरा असा तो प्रकाश होता. नंतर डोळे दिपवून टाकणारा विजांचा कडकडाट झाला आणि इमारती धडाधड कोसळू लागल्या.

हा स्फोट होण्याच्या आधी काही क्षण अमेरिकेत "एनोला-गे" या नावाचे विमान शहरावरून फिरत होते आणि अनिश्चय गुप्त असे महासंहारक स्फोटक त्यांनी हिरोशिमावर टाकले. हे स्फोटक म्हणजे बी-२९च्या विमान कर्मचाऱ्यांनी "छोटा मुलगा" हे नाव दिलेला अणुबॉम्ब होता. हा "छोटा मुलगा" ६ ऑगस्ट १९४५ रोजी सकाळी ८.४५ वाजता हिरोशिमावर कोसळला.



या स्फोटाच्या धक्क्याने ‘मि’ बेशुद्ध पडली. ती शुद्धीवर आल्यानंतर तिला सर्वत्र अंधार आणि भयाण शांतता आढळली. तिला अजिबात हालचाल करता येत नव्हती आणि सभोवतालच्या वातावरणाची तिला प्रचंड भीती वाटत होती. त्याच काळोखात तिला एक लालसर प्रकाशाचा झोत दिसला आणि तिच्या आईच्या हाका ऐकू आल्या.

अंगावर कोसळलेल्या जाडजूड लाकडी फळ्यांमधून ‘मि’ कशीबशी बाहेर पडली. तिच्या आईने तिला कुशीत घेतले आणि तिला म्हणाली, "आपण येथून तांबडतोड बाहेर पडायला हवं..... तुझे वडील आगीच्या ज्वालांमध्ये सापडले आहेत."



‘मि’ आणि तिची आई आगीच्या कडेकडेने चालायला लागल्या आणि मनातल्या मनात वडिलांसाठी प्रार्थना करू लागल्या. ‘मि’च्या आईला तिचे वडिल दिसले व तिने आगीत शिरून झटकन त्यांना ओढून काढले. त्यांच्या अंगावर भयानक जखमा झाल्या होत्या. ‘मि’च्या आईने तिच्या किमोनोचा कमरेचा बंद काढून वडिलांच्या अंगाभोवती बँडेजसारखा गुंडाळला. आणि नंतर तिने आश्चर्य वाटावे अशा प्रकारे ‘मि’च्या वडिलांना स्वतःच्या पाठीवर घेतले व ‘मि’च्या हात धरून पाळायला सुरुवात केली.



"आपण लवकरात लवकर नदीपाशी पोहोचायला हवे," ‘मि’ची आई म्हणाली. ते तिघेजण नदीच्या काठावरून चालत असताना नदीत कोसळले आणि ‘मि’चा हात तिच्या आईच्या हातातून सुटला. "माझे बोट घट्ट पकडून ठेव," ‘मि’ची आई ओरडून म्हणाली.

हजारों लोक आगीपासून दूर पळत होते. ज्यांच्या अंगावरचे कपडे जाळले आहेत डोळे व ओठ भयंकर सुजल्यामुळे चेहरा विद्रूप दिसतो आहे अशी अनेक लहान मुले ‘मि’ ला दिसत होती. ती मुले अक्षरश: भुतासारखी दिसत होती व केविलवाण्या आवाजात रडत होती.





चालता-चालता अंगातील शक्ती नाहीशी होऊन काही लोक जमिनीवर पालथे पडले होते आणि इतर काही लोक त्यांच्या अंगावर कोसळत होते. जिकडेतिकडे प्रेतांचे ढिगारे साचले होते.

'मि' आणि तिच्या आईवडिलांनी आगीपासून सुटका करून घेण्याच्या प्रयत्नात अजून एक नदी ओलांडली.

नदीच्या काठावर पोहोचताक्षणी ‘मि’च्या आईने तिच्या वडिलांचा देह खाली ठेवला आणि ती त्यांच्या शेजारी कोसळली. ‘मि’ ला तिच्या पायांपाशी काहीतरी फडफडताना आढळेले. तिथे पंख जाळल्यामुळे उडत न येणारा एक पक्षी होता. एक माणूस नदीच्या पात्रात तरंगताना तिला दिसला. त्याच्याच मागे एक मेलेले मांजर तरंगत होते.





'मि' ने वळून पाहिले तर एक बाई तिच्या बाळाला छातीशी धरून आक्रोश करीत होती. तिचे बाळ आता दूध पीत नव्हते. ते मृत झाले होते. त्या बाळाला छातीशी धरून ती स्त्री पाण्यातून फरफटत चालत होती. 'मि' तिच्याकडे बघत असतानाच ती पाण्यात खोल खोल चालत दिसेनाशी झाली.



अचानक आकाशात काळे ढग जमले विजा कडाडल्या आणि पाऊस पडू लागला. ऐन उन्हाळ्याचे दिवस असून अचानक काळा, चिकट पाऊस पडत होता. तो थांबल्यानंतर आकाशात एक इंद्रधनुष्य डौलदारपणे उमटले. त्या जखमी मृत वातावरण ते विजोडपणे चमकत होते.

'मि'च्या आईने तिच्या वडिलांनी पाठीवर घेतले. 'मि'चे बोट धरले आणि ते तिघेजण परत एकदा पाळायला लागले. आगीचे लोळ वेगाने त्यांचा दिशेने येत होते. तुटलेल्या कौलांवरून, टेलिफोनच्या तुटलेल्या तारांच्या जाळ्यामधून ते पळत होते. आजुबाजुची सर्व घरे जळत होती.

आता त्या दोघी अजून एक नदीतून चालायला लागल्या. चालताचालता ‘मि’ ला झापड आली आणि नकळत तिच्या नाकातोंडात पाणी गेले. तिच्या आईने तिचे डोके पाण्याबाहेर ओढून काढले. त्या नदीच्या बाहेर पडल्या आणि परत पळू लागल्या.



अखेरीस त्या हिरोशिमाच्या बाहेरील एका किनाऱ्यावर पोहोचल्या. धुक्यात लपेटलेले "मिजियामा" नावाचे बेट पलीकडे दिसत होते. मिजियामा मेपल आणि पाइनवृक्षांनी वेढलेले होते आणि त्याच्याभोवतालची नितळ पाणी होते. सुरक्षित ठिकाणाजवळ पाहोचल्याचा विचाराने 'मि' व तिचे आई वडिल गाढ झोपी गेले. दिवसामागून रात्र अशी तीन चक्रे पूर्ण झाली.



"आजची तारीख काय आहे?" 'मि'च्या आईने तिकडून जाणा या एका माणसाला विचारले. "आज ९ तारीख आहे." त्याने उत्तर दिले. 'मि'च्या आईने बोटे मोजून हिशेब केला आणि ती आश्चर्याने उदगारली "चार दिवस" आपण येथे चार दिवस आहोत!







‘मि’ हळूच रडायला लागली. तेथून जाणाऱ्या एक वृद्ध स्त्रीने पिशवीतून थोडासा भात काढून ‘मि’ ला दिला. तो "मि" ने घेतला आणि ती स्त्री तिथेच कोसळून गतप्राण झाली.

"'मि' बाळा, तुझ्या हातात परवाचा खाऊ तसाच आहे," 'मि'ची आई म्हणाली. 'मि'च्या बंद मुठीत चार दिवसांपूर्वीच खाऊ तसाच होता व तिची मूठ उघतच नव्हती. तिच्या आईने एक एक बोट सरळ करत 'मि'ची मूठ उघडली. बॉम्बस्फोटानंतर चार दिवसांनी 'मि' ने तिच्या हातातील खाऊ टाकून दिला.



जवळच्या एक खेड्यातून अग्निशामक दलाची माणसे त्यांच्या मदतीसाठी आली होती. सैनिक मृत देह हवीत होते. अजूनही नीटपणे उभ्या असलेल्या एका शाळेचे इस्पितळात रूपांतर करण्यात आले होते. 'मि'च्या वडिलांनी सैनिकांनी त्यात हलवले. इस्पितळात डॉक्टर, नर्सेस, मलमपट्टीचे साधने काहीच नव्हते, फक्त निवारा होता.

'मि'चे वडिल त्या इस्पितळात शक्य तितके सुरक्षित आहेत याची खात्री करून 'मि' व तिची आई यांनी परत शहरात आपल्या घरात काही चीजवस्तू वाचल्या आहेत का हे पाहण्याचे ठरविले. त्या घराच्या तिथपर्यंत जमिनाचा जळून गेलेल्या पट्टा दिसत होता. सगळे उध्वस्त झालेले दिसत होते.



त्या दोघी घरापाशी पोहोचल्या. त्या घरात 'मि'चे कुटुंब राहात होते याची साक्ष म्हणून फक्त 'मि'ची एक ताटली वेड्यावाकड्या अवस्थेत जमिनीवर पडलेली दिसत होती. त्यात अजूनही काही रताळी दिसत होती.

९ ऑगस्ट १९४५ 'मि' व तिची आई त्या दगडविटांच्या ढिगाकडे पाहात असताना नागासाकीवर अणुबॉम्ब टाकला जात होता. हिरोशिमाप्रमाणेच तेथेही हजारों लोक मरण पावले. त्यातून वाचलेले लोक बेघर झालेले होते.



या संहाराचे बळी धरलेल्या लोकांमध्ये जपानी लोकांप्रमाणेच कोरिया, चीन, इंडोनेशिया व अमरिक या इतर देशांमधील लोकही सामील होते.

अणुबॉम्ब हा आत्यापर्यंत वापरल्या गेलेल्या इतर स्फोटकांपेक्षा वेगळा होता. इतर साध्य हजारों बॉम्बस्फोटांमुळे जेवढा संहार झाला नास्ता त्याहून कितीतरी जास्त संहार एका अणुबॉम्बच्या स्फोटात झाला. किरणोत्सारी रसायनांमुळे त्यानंतर आजूबाजूचा भूभाग पुढची अनेक वर्षे दूषित झाला आणि त्याच्या परिणामाने अनेक लोक मृत्यू पावले.



'मि'ची त्यानंतर शारीरिक वाढच खुंटली. अनेक वर्षांनंतरही ती सात वर्षांची असताना जेवढी होती तेढीच राहिली. "बॉम्बहल्ल्याच्या धक्क्याने असे झाले आहे" असे तिची आई म्हणते. कधीकधी 'मि' डोके खाजते आहे अशी तक्रार करते. 'मि'चे आई तिच्या डोक्यावरील केस बाजूला करून छोट्या चिमट्याने तिच्या डोक्यावरील कातडीतून काचेसारखे चकाकते तुकडे उपटून काढते. काही वर्षांपूर्वी डोक्यावर झालेल्या बॉम्बस्फोटाचा हा प्रसाद आहे.

'मि'च्या वडिलांच्या शरिरावर सात जखमा झाल्या होत्या. त्या भरून येऊ लागल्या आणि काही काळ ते बरे झाले आहेत असे वाटायला लागले. परंतु एक हिवाळ्यात वीज चमकल्यानंतर त्यांचे सर्व केस गळून पडले आणि त्यांना रक्ताच्या उलट्या झाल्या. नंतर अंगभर निळेजांभळे वण उठले आणि ते मरण पावले. "देवानेच आमचे आयुष्य वाचविले," असे म्हणणारे कित्येक लोक नंतर अशा प्रकारे किरणोत्साराच्या संसर्गाने मरण पावले.



बॉम्बस्फोटांची घटना १९४५ मध्य घडली असली तरी या संसर्गाने पीडित काही लोक अजूनही इस्पितळात आहेत. त्यांच्या या दुखण्यावर कोणताही इलाज नाही.

हिरोशिमामध्ये आता दरवर्षी ६ ऑगस्ट रोजी बॉम्बहल्ल्यात मरण पावलेल्या लोकांचे नातेवाईक दिव्यांवर मृत व्यक्तींची नावे कोरून ते दिवे नदयांच्या प्रवाहात सोडतात. हिरोशिमातील सात नदया ते दिवे देऊन संथपणे समुद्राच्या दिशेने वाहत असतात. 'मि' जी अजूनही एका लहान मुलीएवढीच दिसते टी एका दिव्यावर "माझा वडिल" व दुसऱ्यावर "एक पक्षी" असे लिहित. तिची आता केस पांढरे झालेली आई दुःखद अंतःकरणाने 'मि' ते दिवे नदीच्या पात्रात सोडत असताना पाहात. "हे परत घडणार नाही," ती पुटपुटते. "जर कोणी परत अणुबॉम्ब टाकला नाही तर."



## या पुस्तांविषयी थोडेसे

१९५३ मध्ये मी अणुबॉम्बविषयक चित्रांचे "गेनेबेके नो झू" या नावाचे जपानमधील हिक्काइडो येथे एक प्रदर्शन आयोजित केली होते. प्रदर्शन पाहायला जमलेल्या लोकांमध्ये माझ्या चित्रांकडे रागाने पाहणारी एक स्त्री मला दिसली. काही वेळाने ती घोळक्यातून बाहेर येऊन माझाशी बोलू लागली.

ती म्हणाली, मी या प्रदर्शनाला भेट देण्यासाठी आले कारण मळा वाटले तुम्ही अणुबॉम्बच्या यातना जाणवतील असे प्रदर्शन मांडले आहे. मी आत यायचे नाही असे आधी पक्के ठरविले होते. पण आता तुमची चित्रे पाहिल्यानंतर मी तुम्हाला माझी कथा सांगू इच्छिते.

बॉम्बस्फोटानंतर मी हिक्काइडोला स्थायिक झाले. येथील लोकांना माझ्याबद्दल दया किवां सहानुभूति वाटत नाही. मी बॉम्बहल्ल्याबद्दल बोलायला लागले की अतिरंजित गोष्टी सांगून त्यांची दया मिळविण्याचा प्रयत्न करते असे त्यांना वाटते. यामुळे मी आता तो विषयच बंद केला आहे. हे बोलून त्या महिलेने क्षणभर डोळे मिटले. नंतर ती ध्वनिवर्धकापाशी गेली व अक्षरश: ओरडून बोलू लागले.

आत्ता येथे जे लोक जमले आहेत ते माझ्यावर विश्वास ठेवतील अशी आशा आहे. कृपया माझे म्हणणे ऐकून घ्या. माझ्यावर विश्वास ठेवा. आणि रडत, अडखळत तिने तिची कथा सांगाय्ला सुरुवात केली.

बॉम्बहल्ल्यातून सुटकेचा केलेला प्रयत्न, नवऱ्याला पाठीवर आणि मुलीला हाताशी धरून ओलांडलेल्या नदया हे सर्व ती सांगत राहिली. लोक ऐकत होते. काही रडत होते. तिचे सांगून झाल्यावर ती फक्त एवढेच म्हणाली, "माझे म्हणणे ऐकून घेतल्याबद्दल आभारी आहे."

हृदय हेलावून टाकणारा तो प्रसंग माझ्या नजरेसमोर नंतर तसाच राहिला. हे पुस्तक त्या महिलेच्या कथेवर आधारित आहे. त्यात काही ठिकाणी इतर लोकांनी सांगितलेल्या अणुबॉम्बच्या प्रसंगांचे धागे गुंफलेले आहेत.

मी आता सत्तरी ओलांडली आहे. मला स्वतःला मुले नातवंडे नाहीत. पण जगभरातल्या नातवंडासाठी मी ही कथा लिहिली आहे. मला ती पूर्ण करायला खूप वेळ लागला कारण घडून गेलेल्या वाईट घटनांबद्दल नवीन पिढीला कसे सांगावे हा प्रश्न होता.

मी माझ्या प्रकाशकांचे व चिबा बंधूचे त्यांनी दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल आभार मानतो. माझ्या सर्व मित्रांचाही मी आभारी आहे.

**तोशी मारूकी**

